**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत माध्यमिक शालांत परीक्षा पूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधेत वाढ करणे या योजनेतंर्गत अनुसूचित घटक कार्यक्रमांतर्गत मोफत पुस्तकपेढी योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी-२०२१/प्र.क्र.४२/कौशल्य-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० सप्टेंबर, २०२१.

**वाचा :** संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : १२/नियोजन/अनु.जा.घ.का./२०२१/प्र.क्र.३६/६८, दिनांक ०९ मार्च, २०२१.

**प्रस्तावना :-**

सन १९८६ च्या नवीन शैक्षणिक धोरणाप्रमाणे माध्यमिक स्तरावरील शिक्षणात कार्यानुभव विषय शिकविण्यावर भर देण्यात आला होता जेणेकरुन विद्यार्थी भावी आयुष्यात वर्ल्ड ऑफ वर्क साठी तयार होऊ शकतील. राज्य शासनाने अनेक वर्षापासून माध्यमिक शालांत स्तरावर कार्यानुभव विषयाला पर्याय म्हणून अभ्यासक्रमात कौशल्यावर आधारित उपयुक्त असे व्यवसायिक अभ्यासक्रम उपलब्ध करुन दिले आहेत.

सद्यस्थितीत १६९ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रामध्ये माध्यमिक शालांत परिक्षा पूर्व तांत्रिक/व्यवसायिक अभ्यासक्रम शिकविण्यात येतात.

शासकिय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र यांमधून प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण घेत असताना प्रशिक्षणार्थ्यांना रोजगाराभिमुख प्रशिक्षण देऊन प्रशिक्षणार्थ्यांना रोजगार मिळविण्यात सक्षम बनविण्यात येते. प्रशिक्षणार्थ्यांना स्वत:च्या कर्तृत्वाबद्दल आत्मसंशोधन,क्रियाशिलता निर्माण करणे तसेच प्रशिक्षणार्थ्यांना सामाजिक ज्ञानाची व उत्पादनाच्या पद्धतीची माहिती मिळविणे सहज शक्य होते. स्वत: अथवा इतरांच्या सहाय्याने सांघिकरीत्या काम करण्याचा विश्वास व जबाबदारीची जाणिवेची वाढ करणे इ.बाबी विषयक कलागुण प्रशिक्षणार्थ्यांमध्ये निर्माण करण्यात येतात. सदर योजनेच्या माध्यमातुन वैयिक्तक लाभाच्या योजनेच्या माध्यमातून प्रत्यक्ष प्रशिक्षणार्थ्यांना त्यांच्या आवडीच्या व्यवसायातील हत्यारे व उपकरणे, आवश्यकतेनुसार पुस्तके उपलब्ध होतील.

सध्यस्थितीत तंत्र शिक्षण या विकास क्षेत्रांतर्गत अनुसूचित जाती घटक कार्याक्रमांतर्गत जिल्हा नियोजन व विकास समितीमार्फत अनुसूचित जातीच्या प्रशिक्षाणार्थ्यांना विनामुल्य हत्यारसंच व क्रमिक पुस्तके उपलब्ध करून देण्यासाठी नियमितपणे निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे व त्याप्रमाणात खर्च होत होता. तथापि, काही जिल्हाधिकारी कार्यालयांनी सदर योजना राबविण्याबाबतचे प्रशासकीय मान्यतेचे शासन निर्णय उपलब्ध करुन देणेबात संबंधित जिल्हा व्यवसाय व प्रशिक्षण अधिकारी

कार्यालयांना कळविले आहे. या पार्श्वभूमीवर संचालनालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत माध्यमिक शालांत परीक्षा पूर्व तांत्रिक/ व्यवासायिक शिक्षणाच्या सुविधेत वाढ करणे या योजनेतंर्गत अनुसूचित घटक कार्यक्रमांतर्गत मोफत पुस्तकपेढी योजना राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत माध्यमिक शालांत परीक्षा पूर्व तांत्रिक / व्यवासायिक शिक्षणाच्या सुविधेत वाढ करणे या योजनेतंर्गत अनुसूचित घटक कार्यक्रमांतर्गत मोफत पुस्तकपेढी योजना राबविण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**१) <u>योजनेच्या मार्गदर्शक सूचना</u> :-**

१. कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत राज्यात राबविण्यात येत असलेल्या माध्यमिक शालांत परीक्षा पूर्व तांत्रिक/व्यवासायिक शिक्षणाच्या सुविधेत वाढ करणे या योजनेच्या माध्यमातून शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रामध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या प्रशिक्षणार्थ्यांना आवश्यक त्या प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करून देण्याची जबाबदारी जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील.

२. सदर योजना जिल्हास्तरीय योजना असल्याने, संबंधित जिल्ह्याच्या मागणी कार्यक्रमांतर्गत प्रधान लेखाशिर्ष २२०३ खाली नियतव्ययाची मागणी संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा नियोजन समितीकडे करण्यात यावी. तसेच दरवर्षी निधी अर्थसंकल्पीत करून विहित नियमानुसार खर्च होईल, याची जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच जिल्हा वार्षिक योजनांकरिता अनुसूचित जाती कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ वर्षासाठी सर्व जिल्हायांना नियतव्यय यापूर्वीच मंजूर करण्यात आला आहे. या मंजूर नियतव्ययातुनच या वर्षाचा खर्च भागविण्यात यावा.

३. सदर योजना जिल्हास्तरीय योजना असल्याने संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी नियोजन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सूचनेनुसार जिल्हा नियोजन समितीकडे मागणी करावी.

४. या योजनेव्दारा उपलब्ध निधीतून खेरेदी करण्यात येणारी पुस्तके, संदर्भ सहित्य व तद्नुषंगिक बाबींना तांत्रिक मान्यता देण्यास सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. या योजनेचा लाभ हा, वैयक्तिक लाभाच्या योजनांबाबत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभ हस्तांतरण प्रक्रियेद्वारे अदा करण्यात यावी

२) <u>निकष/पात्रता</u> :-

१. सदर योजना लाभार्थी पात्रताधारक प्रशिक्षणार्थ्यांना त्याचे प्रशिक्षण हजेरी नियमानुसार पूर्णवेळ करणे आवश्यक आहे.

२. सदर योजनेकरीता अनुसूचित जातीमधील युवकांनाच लाभ देण्यात येणार आहे.

३. प्रशिक्षणास प्रवेशित प्रशिक्षणार्थ्यांना सदर योजनेचा लाभ देय राहील.

४. सदर योजनेंतर्गत प्रत्यक्ष लाभ देण्याची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. तसेच सदर योजनेवर सनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील.

५. या योजनेचा लाभ हा, वैयक्तिक लाभाच्या योजनांबाबत शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभ हस्तांतरण प्रक्रियेद्वारे अदा करण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अ.नौ.संदर्भ क्रमांक ०७/ शि-१, दिनांक ०२/०८/२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक :- विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन, अनु.क्र.४, नियम क्रमांक २७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९३०१६५९१२३२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Dr Suvarna
Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2021.09.30 17:00:56 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
७. सर्व मा.विधानमंडळ सदस्य
८. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मंत्री, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
१२.प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१३.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१४.आयुक्त, समाजकल्याण संचालनालय, पुणे
१५.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई, महाराष्ट्र राज्य
१६.सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती (संचालनालयामार्फत)
१७.महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१९.सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालये (संचालनालयामार्फत)
२०.जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
२१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२.निवडनस्ती /कौशल्य-२.